**पुराभिलेख संचालनालयातील रिक्त पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेण्यासाठी सेवा पुरवठादार संस्थेच्या निवडीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.मपुवि- २०२३/प्र.क्र.४०/सां.का.२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २२ ऑगस्ट, २०२३

वाचा :- १) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.काआआ-२०१३/ प्र.क्र.२३३/ कामगार-८, दि.१४.०३.२०२३.
२) शासन शुध्दीपत्रक उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.काआआ-२०१३/ प्र.क्र.२३३/कामगार-८, दि.०९.०५.२०२३.
३) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, उर्जा व कामगार विभाग यांचे अ.शा.पत्र. दिनांक १०.०७.२०२३
४) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.आकृबं-२०२१/ प्र.क्र.१९४(भाग-२) /आस्थापना, दि.११.०७.२०२३.
५) संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र.पुरा.संचा/प्रशा/१०- कंत्राटी सेवा/२०२३/बी-२१३१, दि.०२.०८.२०२३.

प्रस्तावना :-

पुराभिलेख संचालनालयाचा संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये "१९२ नियमित पदे + २२ पदे बाहययंत्रणेकडून उपलब्ध करून घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा" याप्रमाणे २१४ पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. सुधारित आकृतीबंधानुसार नाईक, शिपाई/ चपराशी, पहारेकरी संवर्गातील पदे मृत संवर्ग म्हणून घोषित करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयानुसार मृत संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत असतील त्यापदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती व अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यानंतर अशा एकूण २२ पदांवरील सेवा आवश्यकतेनुसार बाहययंत्रणेव्दारे घेण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. पुराभिलेख संचालनालय, मुंबई कार्यालयातील बाहययंत्रणेन्वये भरावयाच्या **२२ बहुउद्देशीय गट-ड** कर्मचा-यांपैकी सदय:स्थितीत रिक्त असलेली एकूण ८ पदे उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये बाह्ययंत्रणेने भरण्यासाठी संचालनालयाने संदर्भ क्र.५ येथील पत्रानुसार प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

३. संचालनालयाच्या प्रस्तावानुसार संचालनालयातील बाहययंत्रणेव्दारे भरावयाच्या एकूण २२ बहुउद्देशीय गट-ड कर्मचा-यांपैकी सदय:स्थितीत रिक्त असलेल्या एकूण ८ पदांची कामे (तसेच नजीकच्या काळात व्यक्तीच्या सेवानिवृत्ती व अन्य कारणामुळे रिक्त होणा-या मृत संवर्गातील १४ पदांची कामे) बाह्ययंत्रणेने करुन घेण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय व संदर्भ क्र.२ येथील शासन शुध्दीपत्रकातील तरतूदीनुसार सेवा पुरवठादार संस्थेची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

पुराभिलेख संचालनालयाच्या प्रस्तावानुसार बाहययंत्रणेव्दारे भरावयाच्या एकूण २२ बहुउद्देशीय गट-ड कर्मचा-यांपैकी सदय:स्थितीत रिक्त असलेल्या एकूण ८ पदांची कामे (तसेच नजीकच्या काळात व्यक्तीच्या

सेवानिवृत्ती व अन्य कारणामुळे रिक्त होणा-या मृत संवर्गातील १४ पदांची कामे) बाह्ययंत्रणेने करुन घेण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय व संदर्भ क्र.२ येथील शासन शुध्दीपत्रकातील तरतुदीनुसार सेवापुरवठादार संस्थांच्या नामिकासुचीतील **“ ॲक्सेंट टेक सर्व्हिसेस लि.”** या सेवापुरवठादार संस्थेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक १ शासन निर्णय व संदर्भ क्रमांक २ येथील शासन शुध्दीपत्रकानुसार निश्चित केलेल्या अटी व शर्ती - (SOP) तसेच संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रातील सुचनांनुसार सदय:स्थितीत रिक्त असलेल्या ८ पदांची कामे बाहययंत्रेणेने करुन घेण्यासाठी मागणीपत्र नोंदविण्यासह इतर सर्व आवश्यक ती पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

०३. सदरचा खर्च “मागणी क्र- झेडडी-०२, प्रधानशिर्ष २२०५-कला व संस्कृती, (००) १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५), १०, कंत्राटी सेवा,” या लेखाशिर्षांतर्गत त्या त्या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२३०८२२१८०३४६७९२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.08.22 18:05:52 +05'30'

**( सु.दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
११. उप सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२. संचालक, पुराभिलेख संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र.
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
18. निवडनस्ती/सां.का.२